शासकीय कार्यालयात पिण्याचे पाणी पुरविण्याकरिता मासिक अल्प मोबदला प्रदानाबाबत.

महाराष्ट्र शासन,
वित्त विभाग,
परिपत्रक क्र.-मआखा-1097/प्र.क्र.25/97/विनियम,
मंत्रालय, मुंबई-400 032. दिनांक :- 9 जून, 1999.

संदर्भ :- 1. महाराष्ट्र आकस्मिक खर्च नियम-1965,
2. शा.प., वि.वि.क्र. एमसीई-1076/2002/जीईएन-6, दिनांक 17.3.1977.
3. शासन अधिसूचना क्र.-1092/सीआर-146/92/विनियम, दिनांक 30.9.1993.

परिपत्रक :- शासकीय कार्यालयात आवश्यकता असल्यास, चतुर्थ श्रेणीतील कर्मचा-यांना त्यांच्या स्वत:च्या कर्तव्या-खेरीज पिण्याच्या पाण्याचा पुरवठा करण्याकरिता प्रत्येक दिवशी एका माठात भरणेनुसार पाणी भरण्याकरिता संदर्भाधीन दिनांक 30.9.1993 च्या शासन अधिसूचनेअन्वये रु.20/- इतका अल्प मोबदला प्रदान करण्यात येतो. सदर अल्प मोबदला प्रदानात सुधारणा करण्याचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता. याबाबत शासनाने पुढील अटींच्या अधीन राहून निर्णय घेतला आहे.

1) गट-4 चा कर्मचारी त्यांचे स्वत:चे कर्तव्य सांभाळून दर दिवशी जास्तीत जास्त 5 माठ आवश्यकतेनुसार सतत भरुन राहतील असा पाण्याचा पुरवठा करु शकेल.
2) एका माठात सतत पाण्याचा पुरवठा करुन तो भरुन ठेवण्यासाठी दरमहा प्रतिमाठ रु.30 (रुपये तीस) इतका अल्प मोबदला प्रदान अनुज्ञेय असेल.
3) ज्या कार्यालयात नळाने/जलशीतकाने पाणी पुरविण्यात येते, तेथे माठाने पाणी पुरविण्यात येऊ नये.
4) महाराष्ट्र आकस्मिक खर्च नियम 1965, मधील नियम-72 मधील इतर तरतुदी विचारात घेण्यात याव्यात.
5) संदर्भाधिन अल्प प्रदानासाठी होणारा खर्च "कार्यालयीन खर्च" या गौणलेखा शीर्षातून भागविण्यात यावा.
6) महाराष्ट्र आकस्मिक खर्च नियम 1965 च्या नियम 72 मध्ये आवश्यक ते बदल यथावकाश करण्यात येतील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

वि. रा. शिरसाट
शासनाचे अवर सचिव.

प्रति,

महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-1, महाराष्ट्र, मुंबई-400 020,
महालेखापाल (लेखा परीक्षा)-1, महाराष्ट्र, मुंबई-400 020,
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-2, महाराष्ट्र, नागपूर,
महालेखापाल (लेखा परीक्षा)-2, महाराष्ट्र, नागपूर,
अधिदान व लेखा अधिकारी, वांद्रे/मुंबई,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई,
मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई,
राज्यपालांचे सचिव,
मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
उप मुख्यमंत्र्यांचे सचिव,
सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे स्वीय सहाय्यक,
* प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ शाखा), मुंबई,
* प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा), मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
* प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मादाम कामा रोड, मुंबई,
* प्रमुख न्यायाधीश, कुटुंब न्यायालय, नागपूर/मुंबई, वांद्रे, मुंबई-400 051,
उप संचालक, लेखा व कोषागारे, कोकण विभाग, कोकण भवन, नवी मुंबई/पुणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक/अमरावती,
उप मुख्य लेखा परीक्षक (वरिष्ठ), स्थानिक निधी लेखा, कोकण विभाग, कोकण भवन, नवी मुंबई/पुणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक/अमरावती,
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
सर्व उप कोषागार अधिकारी,
मंत्रालयाच्या सर्व प्रशासकीय विभागांच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख, प्रादेशिक कार्यालय प्रमुख आणि कार्यालय प्रमुख,
मंत्रालयातील सर्व प्रशासकीय विभाग,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांच्या अर्थ विभागातील मुख्य लेखा व वित्त अधिकारी,
विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस रोड, नवी दिल्ली-110 001,
निवड नस्ती, विनियम, वित्त विभाग.

* पत्राने.

एम-479(12500)10-6-99)